**श्रीमती अचला झुंजारराव खांडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.१६२/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ ऑक्टोबर, २०२०

**शासन आदेश**

वाचा : १) समक्रमांकाचे दिनांक १४-०१-२०२० चे शासन आदेश.
२) सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रतिनि-१३१९/प्र.क्र.७४९/१९, दिनांक ३०-०१-२०२० चे कार्यालयीन आदेश.
३) राज्य माहिती आयोग, कोंकण खडपीठ, नवी मुंबई यांचे क्र.रामाआ-२०२०/प्र.क्र.४/कों.खं./आस्था, दिनांक ०५-०२-२०२० चे कार्यालयीन आदेश.

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १४-०१-२०२० च्या आदेशान्वये श्रीमती अ.झुं. खंडेकर, सहायक कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने, राज्य माहिती आयोग, कोंकण खडपीठ, नवी मुंबई, यांच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ३०-०१-२०२० च्या कार्यालयीन आदेशान्वये श्रीमती खांडेकर यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी कार्यमुक्त करण्यात आले होते. संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक ०५-०२-२०२० च्या कार्यालयीन आदेशान्वये श्रीमती खांडेकर यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर **दिनांक ०४-०२-२०२० (म.पू.)** रुजू करुन घेण्यात आले आहे.

२. श्रीमती खांडेकर ह्या दिनांक **दिनांक ०४-०२-२०२० पासून** राज्य माहिती आयोग, कोंकण खडपीठ, नवी मुंबई येथे कार्यरत असून त्यांचा २ वर्षाचा प्रतिनियुक्ती कालावधी **दिनांक ०३-०२-२०२२ रोजी संपुष्टात येणार होता.**

३. मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील पदे मोठया प्रमाणात रिक्त आहेत. यास्तव श्रीमती अ.झुं. खांडेकर, सहायक कक्ष अधिकारी **यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी समाप्त होण्यापूर्वी, त्यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून** श्रीमती खांडेकर, सहायक कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग यांच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा आदेशाच्या दिनांकापासून त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्यात येत आहेत.

४. श्रीमती अ.झुं. खांडेकर, यांनी आपल्या मूळ विभागात (सामान्य प्रशासन विभागात) तातडीने रुजू होऊन तसा अहवाल या विभागास सादर करावा.

५. राज्य माहिती आयोग, कोंकण खडपीठ, नवी मुंबई यांनी श्रीमती खांडेकर, सहायक कक्ष अधिकारी यांना त्यांच्या मूळ विभागात रुजू होण्यासाठी तातडीने कार्यमुक्त करावे व दिनांक २०-१०-२०२० नंतर कोणतेही वेतन व भत्ते अदा करु नये.

६. संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाने श्रीमती अ.झुं. खांडेकर, सहायक कक्ष अधिकारी, या आपल्या विभागात रुजू झाल्याची वस्तुस्थिती या विभागास तात्काळ कळवावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१६१५२४३१३७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VRISHALI VINOD BHINGARDE

Digitally signed by VRISHALI VINOD BHINGARDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administrative Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0863fc5c9cdcc85881943ea0d1a5438c42d27c0b1580feba5579800452b60209, serialNumber=6b870a94454e2b13ee0959c3370d5d53d60a17d4b6d3ed6077e40a0f53e7a053, cn=VRISHALI VINOD BHINGARDE
Date: 2020.10.16 15:26:24 +05'30'

**( वृषाली वि. भिंगार्डे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती अ.झुं.खांडेकर, सहायक कक्ष अधिकारी (संबंधित कार्यालयामार्फत)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२
३. सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
४. उप सचिव, राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, कोकण भवन, सी.बी.डी., बेलापूर, नवी मुंबई, पिन-४००६१४
५. उप सचिव (कार्यासन क्र.६), सामान्य प्रशासन विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
६. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ).